**मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेकरिता निर्माण करण्यात आलेल्या सचिव (अभियंता संवर्ग) हे अस्थायी पद पुढे चालु ठेवण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः मुग्रायो २०१६/प्र.क्र. ५०/पं.रा.-७**

**बांधकाम भवन, ७ वा मजला, २५ मर्झबान पथ,**

**फोर्ट, मुंबई ४००००१**

**तारीख: २३ मार्च,२०१७**

**वाचा -**

१) शासन निर्णय ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्रमांकः ग्रासयो२०१५/ प्र.क्र.१२/योजना-९, दिनांक २८ ऑक्टोबर,२०१५.

२) शासन निर्णय ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्रमांकः ग्रासयो २०१५/प्र.क्र.९/पं.रा.-७ , दिनांक २७ जानेवारी,२०१६

३) शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दिनांक१० फेब्रुवारी,२०१७

४) शासन निर्णय ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्रमांकः मुग्रायो २०१६/प्र.क्र. ५०/पं.रा.७, दिनांक २१ ऑक्टोबर,२०१६

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र राज्यातील न जोडलेल्या वाड्या-वस्त्या जोडण्यासाठी व ग्रामीण भागातील दुरावस्था झालेल्या रस्त्यांची दर्जोन्नती करण्यासाठी राज्यात मुख्यमंत्री ग्रामसडक योजना दि.२८ ऑक्टोबर २०१६ च्या शासन निर्णयान्वये सुरु करण्यात आली आहे. सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयान्वये ग्रामविकास व जलसंधारण विभागांतर्गत सचिव (अभियंता संवर्ग) हे एक पद निर्माण करण्यात आले आहे. वाचा येथील क्र.५ च्या शासन निर्णयान्वये सदर पद दि. २८ फेब्रुवारी, २०१७ पर्यत पुढे चालू ठेवण्यास मंजुरी देण्यात आलेली होती. मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेअंतर्गत सन २०१५-१६ करीता मंजूर रस्त्यांच्या कामांच्या निविदा प्रस्तावांना मंजूरी प्रदान करण्यात आली असून रस्त्यांची कामे सुरु झाली आहेत. तसेच सन २०१६-१७ करीता मंजूर रस्त्यांच्या पहिल्या टप्यातील कामांना प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून रस्त्यांची कामे सुरु झाली आहेत. उर्वरीत दोन टप्यातील निविदांना मंजूरी देण्याची कार्यवाही सुरु असल्याने सचिव (अभियंता संवर्ग) हे एक पद पुढे चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

१. मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेच्या अंमलबजावणीसाठी ग्रामविकास व जलसंधारण विभागांतर्गत प्रपत्र "अ" मध्ये नमूद केलेले सचिव (अभियंता संवर्ग) एक पद, दि. ३०.९.२०१७ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मंजुरी देत आहे. वर नमूद केलेल्या एका पदाचा होणारा खर्च "मागणी क्र. एल-४, ३४५१-सेक्रेटरिएट आर्थिक सेवा ०९०-सेक्रेटरिएट (०१) (०१) ग्रामविकास व जलसंधारण विभाग (३४५१ ००८२)" या लेखाशिर्षाखाली त्या त्या वर्षी मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतुन भागविण्यात यावा.

२. प्रस्तुत आदेश वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दिनांक १० फेब्रुवारी, २०१७ अन्वये विभागांना दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२३१५४३५७०७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

R A Nagargoje

Digitally signed by R A Nagargoje
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=decff3a81eacee2237c8c2d29460e7c459d9f7baaab677f7578d952747d49ab2, cn=R A Nagargoje
Date: 2017.03.24 11:30:20 +05'30'

**(र.आ.नागरगोजे)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षा) मुंबई/नागपूर
२. सचिव, (ग्रा.वि.व पं.रा.) ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन,मुंबई
३. सचिव, मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन,मुंबई
४. मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई
५. उप सचिव (आस्थापना), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन,मुंबई
६. उप सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन,मुंबई
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
८. निवासी लेखाधिकारी, मुंबई
९. वित्त विभाग (व्यय-१५/अर्थ-१७) मंत्रालय,मुंबई
१०. नियोजन विभाग (कार्यासन १४१४), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई

११. कार्यासन अधिकारी (आस्थापना/रोख शाखा/वित्त-१/योजना-८), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई

१२. निवड नस्ती (पं.रा.-७), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई.

प्रपत्र “अ”

ग्रामविकास व जलसंधारण विभाग,शासन निर्णय क्र.मुग्रायो २०१६/प्र.क्र. ५०/पं.रा.-७,
दिनांक २३ मार्च २०१७ चे सहपत्र

| **अ. क्र.** | **पदनाम** | **वेतनश्रेणी** | **पदाची संख्या** | **पदनिर्मितीचे आदेश क्रमांक व दिनांक** | **मुदतवाढीचा दिनांक** | **पदनिर्मितीचा उद्देश** | **शेरा** |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | सचिव (अभियंता संवर्गातील) | रु.३७,४०० ते रु.६७,००० ग्रेड-पे रु.१०,००० | १ | ग्रामविकास व जलसंधारण विभाग शा. नि. क्र.ग्रासयो २०१५ / प्र.क्र.९ / पं.रा.७, दि. २७/१/२०१६ | ३०/९/२०१७ | मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेच्या अंमलबजावणीसाठी | |